जलसंपदा विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयामध्ये मा.महालेखाकार यांचेकडील लेखापरीक्षा पथकाकडून होणा-या लेखापरीक्षणातील परिच्छेद/ आक्षेपांचा जलद निपटारा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
**जलसंपदा विभाग**
**क्रमांकः ऑडिट – २०२५/प्र.क्र.११/२०२५/लेप**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,**
**मंत्रालय, मुंबई. ४०० ०३२.**
**दिनांक : १८ जून, २०२५.**

<u>प रि प त्र क</u>

जलसंपदा विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयांकडील लेखापरीक्षा परिच्छेद / आक्षेपांचा जलद निपटारा करण्यासाठी सह सचिव तथा आंतर वित्तीय सल्लागार यांच्या अध्यक्षतेखाली लेखापरीक्षा समिती काम करते. या समितीच्या बैठकांमध्ये उप महालेखापाल स्वत: उपस्थित असतात. समितीचे अलिकडील काळात घेतलेल्या बैठकामधुन चर्चेस्तव आलेले लेखापरीक्षा परिच्छेद / आक्षेपांचे स्वरुप पाहाता, एकंदरीतच लेखापरीक्षणात उपस्थित होणा-या परीच्छेद / आक्षेपावरील कार्यवाहीबाबत खालील स्पष्ट सूचना या परीपत्रकान्वये देण्यात येत आहेत.

**(अ)** कार्यकारी अभियंता यांनी त्यांचेकडे आलेल्या मा.महालेखाकार यांचेकडील लेखापरीक्षा पथकासोबत लेखा परिक्षण सुरु व समाप्त होताना स्वत: बैठक (Entry & Exit Conference) घेणे अनिवार्य राहिल. तसेच लेखापरीक्षण कालावधीत सोयीनुसार पथकासोबत इतरही वेळेस चर्चा करुन आक्षेपांना योग्य उत्तरे दिली जातील याची दक्षता घ्यावी.

**(ब)** कार्यकारी अभियंता यांनी लेखापरीक्षा पथकासाठी किमान उपअभियंता दर्जाचा अधिकारी समन्वयक म्हणून नियुक्त करावा.

**(क)** उपस्थित होणारे आक्षेपांना उत्तर देणे हे केवळ विभागीय लेखापालाचे काम नसून तांत्रिक अधिका-यांकडून सुयोग्य उत्तरे दिल्यास आक्षेपांचे निराकरण होवू शकते याची नोंद घेवून संबंधित कार्यकारी अभियंता यांनी उपाययोजना कराव्यात.

**(ड)** अधिक्षक अभियंता तथा मंडळ कार्यालय स्तरावर ३ महिन्यातून एकदा, मुख्य अभियंता स्तरावर ६ महिन्यातून एकदा तर महामंडळ स्तरावर वर्षातून किमान एकदा प्रलंबित लेखापरीक्षा आक्षेप / परिच्छेद यांचा आढावा घेणे अनिवार्य राहिल.

**(इ)** प्रकल्पाचे काम पूर्ण झाल्यावर एखादा उपविभाग बंद करुन त्याचे समायोजन / हस्तांतरण दुस-या उपविभागाकडे केले जाते. याप्रमाणे हस्तांतरण / समायोजन करताना प्रलंबित लेखापरीक्षा आक्षेप / परिच्छेद याबाबतची अद्ययावत माहिती तसेच संचिका / अभिलेख याचे हस्तांतरण बंद होणा-या उपविभागाच्या कार्यकारी अभियंता यांनी वैयक्तिक लक्ष देवून करुन घ्यावे. याबाबतची माहिती / अभिलेख हस्तांतरण करणा-या उपविभागाकडून न झाल्यास, त्याची माहिती संबंधित अधिक्षक अभियंता यांना कळवून त्यांचे मार्गदर्शनानुसार पुढील कार्यवाही करण्याची जबाबदारी हस्तांतरण स्विकारणा-या उपविभागाच्या कार्यकारी अभियंता यांची राहिल. या प्रमाणे प्राप्त होणा-या पत्रव्यवहारावर विनाविलंब व प्राथम्याने निर्देश देवून कार्यवाही पूर्ण करण्याच्या सूचना देण्याची जबाबदारी संबंधित अधिक्षक अभियंता यांची राहिल.

(फ) भूसंपादन प्रयोजनार्थ विशेष भूसंपादन अधिकारी यांना दिलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र न मिळाल्याने अनेक परिच्छेद / आक्षेप प्रलंबित आहेत. सदर उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त करुन घेण्याबाबत संबंधित अधिक्षक अभियंता यांनी आपल्या स्तरावर आढावा घ्यावा. आवश्यकतेनुसार संबंधित जिल्हाधिकारी यांना बैठक घेवून निर्देश देण्याची विनंती करण्यात यावी.

(ग) अनेक परिच्छेदामध्ये पर्याप्त सुरक्षा ठेव न घेणे, आवश्यक बँक गॅरंटी न घेणे अथवा बँक गॅरंटी अद्ययावत न ठेवणे अशा स्वरुपाच्या अनियमित बाबी आढळून आल्या आहेत. अशा बाबी उद्भवणार नाहीत याबाबत विशेष दक्षता घ्यावी.

(ह) संचालक राज्य विमा यांचेकडून प्रकल्पासाठी विमा घेतल्यास त्याची रक्कम राज्याच्या एकत्रित निधीमध्ये जाते. त्यामुळे राज्याचे वित्तीय हित लक्षात घेवून सर्व प्राथम्याने राज्य शासनाच्या विमा संचालनालयाकडूनच विमा घेण्यात यावा.

(च) एखादया प्रकरणात शासन स्तरावर प्रस्ताव सादर असल्यास, त्याची सद्यस्थिती उपलब्ध माध्यमातून शासन स्तरावर संपर्क साधुन प्राप्त करुन घ्यावी. व त्यानुसार लेखापरीक्षा पथकास अवगत करावे.

२.       उपरोक्त सूचना / निर्देश हे लेखापरीक्षा समितीच्या बैठकीतील चर्चेआधारे देण्यात येत आहेत. त्यानुसार उपाययोजना केल्यास लेखापरीक्षा पथकाच्या तपासणीमध्ये कमीतकमी लेखाआक्षेप अनुत्तरीत राहतील. पर्यायाने भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचेकडून विधिमंडळात सादर होणा-या अहवालात किमान लेखापरीच्छेद समाविष्ठ होतील. यामुळे लोकलेखा समितीसमोर जलसंपदा विभागास किमान परीच्छेदासाठी साक्ष द्यावी लागेल. या सर्व क्रमाचा विचार करुन लेखापरीक्षा परिच्छेद / आक्षेप यांचेबाबत गांभिर्यपूर्वक व सर्वप्राथम्याने कार्यवाही करण्याची दक्षता सर्व क्षेत्रीय यंत्रणांनी घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावार उपलब्ध करण्यात आले असुन त्याचा संगणक संकेतांक २०२५०६१८१६३७२४०५२७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SATISH KARBHARI JONDHALE

Digitally signed by SATISH KARBHARI JONDHALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=AFF29D2A2C0188D9F6005884FC76B41A9A5422D8C7FF9B58C7D1F77B4B482226, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0627620672613CBEF6F2C00D1E97183870A4A77839246128DCAA5D4831FF2947, cn=SATISH KARBHARI JONDHALE
Date: 2025.06.18 16:38:00 +05'30'

**(सतिश जोंधळे)**
**आंतर वित्तीय सल्लागार व सह सचिव**

**प्रत,**

१) मा.प्रधान महालेखाकार,भारतीय लेखापरीक्षा एवं लेखा विभाग, मुंबई
२) कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ,ठाणे
३) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
४) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव
५) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, छत्रपती संभाजीनगर,
६) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
७) महासंचालक,संकल्पन प्रशिक्षण, जलविज्ञान संशोधन व सुरक्षितता, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक
८) मुख्य अभियंता, जलविद्युत प्रकल्प, मुंबई / पुणे
९) मुख्य अभियंता (द.व प्र.) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१०) मुख्य अभियंता (पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
११) मुख्य अभियंता (जसं) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१२) सह सचिव (दक्षता), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१३) उपसचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१४) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, ठाणे / पुणे/छत्रपती संभाजीनगर/नागपूर/जळगांव

१५) उ.स.(निवसं) (१ & २) , जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१६) अ.अ. व उ.स. (मोप्र-१), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१७) अ.अ. व उ.स. (मोप्र-२), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१८) अ.अ. व उ.स. (मध्यम प्रकल्प), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१९) अ.अ. व उ.स. (लपा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२०) अ.अ. व उ.स. (जवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२१) अ.अ. व उ.स. (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२२) अ.अ. व उ.स. (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२३) अ.मु.स.(जसं), जलसंपदा यांचे स्वीय सहायक
२४) मा. सचिव (लाक्षेवि) जलसंपदा यांचे स्वीय सहायक